# प्रूडेंस क्रैंडल

## समान हक्कासाठी लढणारी शिक्षिका

**लेखक : इलीन**

**मराठी : गार्गी लागू**



# नोट

या गोष्टीची सुरवात  १८३२ मधे झाली. त्यावेळी अमेरिकेच्या दक्षिण भागात बरेच कृष्ण वर्णिय लोक गुलामांचे जीवन जगत होते. त्यांचे मालक त्यांना  आपल्या संपत्तीचा भाग समजत होते. त्यांच्याकडून जिवापाड मेहेनत करून घेत होते. गुलामांना पोटभर अन्नही मिळत नव्हते. गुलाम त्यांच्या मनाप्रमाणे राहू शकत नव्हते.

ही गोष्ट उत्तर अमेरिकेतील आहे जिथे 'गुलाम बाळगणे' बेकायदेशीर होते. तरीही उत्तर अमेरिकेतील कृष्णवर्णियांना तेथिल गोर्या लोकांसमान हक्क नव्हते. काही गोर्या लोकांना त्यांच्या मुलांनी कृष्णवर्गिय मुलांबरोबर एकाच शाळेत शिकणे मान्य नव्हते. कृष्णवर्गिय मुलांसाठी वेगळी शाळा करण्यासही त्यांचा विरोध होता. त्यांना कृष्ण वर्गियाबरोबर कुठल्याच प्रकारची जवळीक नको होती. नाही ते त्यांच्या वस्तीत राहू द्यायला तयार होते, ना त्यांच्याबरोबर एका टेबलवर खायला तयार होते. एव्हढेच नाही तर चर्चमधे एकत्र प्रार्थना करायलाही तयार नव्हते.

पण काही लोकांना हे पटत नव्हते. त्यातील एक होती 'प्रूडेंस क्रैंडल'! ती एक गोरी शिक्षिका होती आणि क्वेकर्सपण होती. क्वेकर्स समुह कायम युध्द व अत्याचाराविरूध्द होता. हा समुह चांगल्या शिक्षणाचे महत्व जाणून होता. प्रूडेंस क्रैंडलला मनापापून वाटत होते की प्रत्येक मुलाला शाळेत जाण्याची संधी मिळायलाच हवी. यासाठी तिने केलेल्या संघर्षाची ही कहाणी आहे. प्रत्येक मुलाला शाळेत जायला मिळावे यासाठी तिने खूप प्रयत्न केले.



## नोव्हेंबर १८३२

प्रूडेंस क्रँडलने दरवाजा उघडला आणि
एका मोठ्या मैदानात प्रवेश केला.
कँटरबरी फिमेल बोर्डिंग स्कूलकडे तिने
अभिमानाने पाहिले.
कँटरबरी, कनेक्टिकट, आणि इतर काही
शहरांतील मुली तिच्या विद्यार्थिनी
होत्या.



काही विद्यार्थिनी रोज चालत शाळेत येत होत्या. बाकिच्या शाळेतच वरच्या मजल्यावर रहात होत्या कारण त्यांची घरे खूप लांब होती. प्रूडेंस त्यांना वाचायला आणि भूगोल विषय शिकवीत असे.



ती मुलींना शिवणकाम शिकवायची व कसे वागावे, बोलावे हेही शिकवायची. मुलींच्या पालकांना तिचे शिकविणे खूप आवडत होते. त्यांच्या मते पूर्ण राज्यांत ती सर्वात चांगली शाळा होती.



एकदा प्रूडेंसला एक मुलगी भेटायला आली. सराह हैरिस! ती आधी बर्याच शाळांमधून जाऊन आली होती. ती नेहमी तिची मैत्रिण, मारियाकडे येत असे. मारिया प्रूडेंससाठी काम करित होती.

पण आता साराह, प्रूडेंसकडे तिच्याकडे काही बोलण्यासाठी आली होती. साराह लहान असतांना एका प्रादेशिक शाळेत शिकली होती. न्यू इंग्लंडमधे काही शाळांमधे कृष्णवर्णिय व गोरी मुले एकत्र शिक्षण घेऊ शकत होती. पण मोठ्या कृष्णवर्णिय मुलांसाठी अशा शाळा खूप कमी होत्या. साराहच्या शाळेतले काही विद्यार्थी प्रूडेंसच्या शाळेत शिकत होते. साराहलाही आता त्या शाळेत शिकायचे होते. कृष्णवर्गिय मुलांना शिकविणे हे तिचे स्वप्न होते.

प्रूडेंसने साराहचे म्हणणे पूर्णपणे ऐकून घेतले पण निश्चित असे काहीच सांगितले नाही. तिला पूर्णपणे माहित होते की शहरांतील लोकांना तिने फक्त गोर्या मुलांनाच शाळेत प्रवेश द्यायला हवा आहे. तिने पुढचे काही आठवडे खूप विचार करण्यात घालविले. काय करता येईल ?

केवळ त्वचेच्या रंगावरून लोकांवर होणारा अन्याय प्रूडेंसला बिलकूल मान्य नव्हता. ती एक क्वेकर होती. क्वेकर प्रामाणिकपणा व सर्वांना न्याय मिळालाच पाहिजे यावर विश्वास ठेवणारे होते. प्रूडेंसने साराहला शिकविण्याचा निर्णय घेतला.






# जानेवारी १८३३

प्रूडेंसच्या निर्णयामुळे शहरातील लोक नाराज झाले. शाळेतल्या मुलींचे पालक एकत्र येऊन प्रूडेंसला भेटायला आले. कृष्णवर्णिय मुलगी त्यांच्या मुलीबरोबर शाळेत त्यांना नको होती. साराहने निघून जावे अन्यत: ते त्याच्या मुलींची नावे शाळेतून काढून टाकतील. त्यांच्याकडून मिळणारे फीचे पैसे बंद झाले की शाळा बंदच पडणार होती.

'काही हरकत नाही, होऊ दे शाळा बंद !' प्रूडेंस  म्हणाली. 'मी साराहला शाळेतून काढणार नाही'

त्यानंतर पुष्कळ  मुलींच्या पालकांनी मुलींना प्रूडेंसच्या शाळेतून काढून टाकले. शाळा बंद पडण्याची शक्यता निर्माण झाली. आता पुढे काय करायच याचा विचार प्रूडेंस करीत होती





कृष्णवर्णिय मुलांना शाळेत प्रवेश द्यायचा नाही हे प्रूडेंसला न्यायाला धरून वाटत नव्हते. तिने शाळा बंद करण्याचा निर्णय घेतला. तिने तरूण कृष्णवर्णिय मुलीसाठी नविन शाळा सुरू करायच ठरविलं.

त्यानंतर प्रूडेंस  बोस्टनला गेली. तिथे ती प्रसिध्द अबाॅलिशनिस्ट, विल्यम ग्लॅड गैरिसन यांना भेटली. अबालिशनिस्ट गुलामगिरीच्या विरूध्द होते. स्वतंत्र कृष्णवर्णिय लोकांना  न्यायाला धरून वागणूक मिळायला हवी या विचांरांचे होते. गैरिसनने प्रूडेंसचे म्हणणे काळजीपूर्वक ऐकले. ते प्रूडेंसच्या नविन शाळेसाठी कृष्णवर्णिय मुलांचा शोध घेण्यासाठी तयार झाले. प्रूडेंस क्रैंडलने आजूबाजूच्या शहरांत जाऊन तिच्या नवीन शाळेबद्दल माहिती दिली.

ती कैंटरबरीला परत आली. तिने तिच्या शाळेतील गोर्या मुलींना शाळा लवकरच बंद होणार आहे असे सांगितले आणि त्यांना तिच्या नविन शाळेबद्दलही सांगितले.





ही बातमी शहरवासियांसाठी एक धक्का होता. त्यांनी सर्व लोकांची सभा बोलाविली. कृष्णवर्णिय मुलींसाठी कैंटरबरीमधे शाळा म्हणजे कैंटरबरी शहर बदनाम करण्यासारखे होते.



शेजारच्या शहरातील एका धर्मगुरूने प्रूडेंस क्रैंडलच्या बाजूने बोलण्याचा प्रयत्न केला. त्यांचे नाव होते रेवरेंड सामुएल मे. पण लोकांनी त्याचे अजिबात ऐकले नाही. त्यांनी निर्णय घेऊन टाकला होता..... नवीन शाळा पाडून टाकायची.

## एप्रिल १८३३

प्रूडेंसने नवी शाळा एप्रिलमधे उघडली. कनेक्टिकट आणि आजूबाजूच्या राज्यातून कृष्णवर्णिय मुली शिकण्यासाठी येऊ लागल्या. चांगल्या शाळेत शिकायला मिळणार असल्यामुळे मुली खुष होत्या. पण कैंटरबरीमधील लोकांनी त्यांचे स्वागत केले नाही. दुकानदारांनी या नविन आलेल्या विद्यार्थिनींना शाळेची वह्या पुस्तके विकत दिली नाहीत. त्या आजारी पडल्यावर डाॅक्टर त्यांच्यावर इलाज करायला तयार झाले नाहीत. चर्चमधेही प्रार्थनास्थळामधे त्याना प्रवेश नव्हता. एव्हढेच नाही तर शहरामधे रस्त्यावरून जात असतांना लोक भोंगा वाजवायचे. त्यांच्यावर चिखल उडवायचे...दगड मारायचे





प्रूडेंसने मुलींचे मनापासून कौतुक केले. शहरांतील गोरे लोक या कृष्णवर्णिय मुलींचा द्वेष करीत होते पण मुली त्यांच्या शिव्या शापाकडे दुर्लक्ष करीत होत्या. आणि आपले सर्व लक्ष अभ्यासाकडे देत होत्या.

पण प्रूडेंस आणि मुली खचून गेल्या नाहीत. प्रूडेंसने शाळेच्या वस्तु मागविण्यासाठी नवीन मार्ग शोधला. तिचा मित्र दुसर्या शहरातून तिच्यासाठी सामान खरेदी करून आणित असे. कृष्णवर्णिय मुलींनी दुसर्या चर्चमधे जायला सुरवात केली जिथे त्यांचे मनापासून स्वागत झाले.



अजूनही कैंटरबरीचे लोक प्रूडेंसची शाळा बंद करण्याच्या मागे होते. त्यासाठी त्यांनी राज्यातील पुढार्यांची मदत मागितली.
मे १८३३ मधे कनेक्टिकटने " ब्लॅक कानून" मान्य करून घेतला. या कायद्यानुसार कोणतीहि शाळा दुसर्या राज्यातील कृष्णवर्णिय विद्यार्थांना स्थानिक लोकांच्या परवांगीशिवाय प्रवेश देऊ शकणार नाहीत.






हा कायदा झाल्यावर कैंटरबरीच्या लोकांनी आनंदोत्सव साजरा केला. चर्चमधे घंटा वाजविल्या, फटाके उडविले. त्यांना वाटले की आता प्रूडेंस तिची शाळा बंद करेल. पण प्रूडेंसने या नव्या कायद्याची जराही दखल घेतली नाही.

## जून 1833

उन्हाळ्याच्या दिवसात कुणीतरी शाळेचा दरवाजा वाजविला. शहराचा शेरिफ प्रूडेंसला अटक करण्यासाठी आला होता. प्रूडेंसने "ब्लॅक कानून" तोडला होता. आता प्रूडेंसला दंड भरावा लागेल नाहीतर तुरूंगात जावे लागेल. प्रूडेंसला लोकांना जाणवून द्यायचे हेते की " ब्लॅक कानून" अत्यंत चुकीचा होता. तिने दंड भरण्या नकार दिला. त्यामुळे लोकांच्या लक्षात येईल की ती या अन्यायकारक कायदेयावर किती नाराज होती. प्रूडेंसने शेरिफबरोबर तुरूंगात जाणे पसंत केले.



रेवेरेनेडनी विचारले, "तुला तुरूंगात जायची भिती वाटते आहे का?”
"मुळीच नाही," प्रूडेंस म्हणाली. "मला भिती वाटते की ते मला तुरूंगात टाकणार नाहीत." क्वेकर्सनाही न्याय मिळविण्यासाठी असहकार सहन करावा लागला होता अशा अनेक गोष्टी तिला आठवल्या. या विचारांनी तिला धीर आला, बळ मिळाले.

'ठक्क' आवाज करून तुरूंगाचा दरवाजा बंद झाला. प्रूडेंसला तुरूंगाच्या कोठडीत डामले गेले होते. दुसर्या दिवशी रेवेरेनेड मे ने दंड भरला आणि प्रूडेंस परत शाळेत आली. पण तिने कायदा मोडला होता म्हणून तिला आगस्टमधे न्यायालयात हजर रहावे लागणार होते.





नंतर कुणीतरी शाळेच्या विहीरीमधे खूप कचरा टाकला. शाळेतील मुली ते घाण पाणी पिऊ शकल्या नाहीत. प्रूडेंसच्या वडिलांनी त्यांच्या शेतातून पिण्यासाठी पाणी आणून दिले.

त्यानंतर शहरातील लोक प्रूडेंसचा आणखीनच द्वेष करू लागले. त्यांनी शाळेच्या खिडकीमधून दगड आणि सडकी अंडी फेकली.





आगस्टमधे प्रूडेंसची कोर्टाची तारीख आली. कोर्ट शहरवासियांनी खचाखच भरले होते. त्यामधे काही प्रूडेंसचे मित्रही होते. प्रूडेंसचे एक मित्र, आर्थर टप्पन न्यूयार्कवरून प्रूडेंसची मदत करण्यासाठी आले होते. त्यांनी प्रूडेंसच्या वकिलाची फी दिली होती.

कैंटरबरी लोकांच म्हणणं होत की प्रूडेंसच्या शाळेने कनेक्टिकटच्या कायद्याचा भंग केला होता. प्रूडेंसच्या मित्राने सांगितले की मुळात कायदाच अन्यायकारक आहे. कुणाचे बरोबर, कुणाचे चूक, कोर्ट काहीच निर्णय घेऊ शकले नाही. प्रूडेंसला आक्टोबरमधे पुन्हा याव लागणार होते.

आक्टोबरमधे झालेल्या सुनावणीत कोर्टाने कायदा मोडल्याबद्दल प्रूडेंसला दोषी ठरविले. प्रूडेंसच्या वकिलाने परत कोर्टाकडे धाव घेतली. त्यांना पटवून द्यायच होत की कायदाच अन्यायपूर्ण होता. वकिलांनी प्रूडेंसच्या केसचा पूर्ण अभ्यास केला.





शहरांतील लोक शाळेबरोबर सतत भांडण उकरून काढीत होते. नंतर जानेवारी महिन्याच्या एका थंड दिवशी शाळेमधून काहीतरी जळल्याचा वास येऊ लागला. थोड्याच वेळात पूर्ण शाळा धुराने भरून गेली. कोणीतरी ओरडले, " अरे आगीची सूचना देणारी घंटा वाजवा."

कैंटरबरीचे लोक आग विझविण्यासाठी आले. ते शाळेचा द्वेषच करीत होते. पण आग पसरून सारे शहर आगीच्या भक्षस्थानी त्यांना पडू द्यायचे नव्हते. थोड्या प्रयत्नानंतर आग आटोक्यात येऊन शाळा सुरक्षित राहिली.

## जुलै १८३४

काही महिन्यानंतर परत प्रूडेंसची केस कोर्टात उभी राहिली. पण यावेळीसुध्दा कोर्ट काहीच निर्णय घेऊ शकले नाही.कोण जिंकले, कोण हरले, हे ठरविणे कठीण होते.





प्रूडेंसच्या वकिलांनी तिला सांगितले की ती शाळा चालू ठेवू शकते. ती तिच्या विद्यार्थिनीसाठी समाधानी होती. पण तीला मुळात हा अन्यायपूर्ण कायदाच कोर्टाकडून रद्द करून हवा होता.

कोर्टाच्या तारखा चालू असतांना प्रूडेंसची केल्विन फिल्लो नामक माणसाची भेट झाली. तो न्यूयार्कमधे धर्मगुरू होते. केल्विन व प्रूडेंस एकमेकांच्या प्रेमात पडले.





केल्विनने विवाहाचा प्रस्ताव प्रूडेंससमोर ठेवला. प्रूडेंसने सहमती दर्शविली. कोर्टाच्या शेवटच्या सुनावणीनंतर त्यांनी विवाह केला. पण शाळेचे खूपच काम राहिले होते. प्रूडेंसना शाळेत परतावे लागले.

## ९ सप्टेंबर १८३४

त्या रात्री प्रूडेंस व तिच्या विद्यार्थ्यांना काचा फुटल्याचा आवाज आला. त्यांनी बघितले की लोक लोखंडाच्या कांबीनी शाळेच्या खिडक्यांची तोडमोड करीत आहेत.





काही लोक तुटलेल्या खिडक्यांतून आत घुसले आणि फर्निचर तोडायला सुरवात केली. इतकी वाईट परिस्थिती पूर्वी कधीच आली नव्हती. प्रूडेंसला भिती वाटत होती की पुढच्यावेळी शाळेतील मुलीवर जखमी होण्याची वेळ येऊ नये.परिस्थिती आता हाताबाहेर जाऊ लागली होती.

दुसर्या दिवशी प्रूडेंसने शाळा बंद केली. रेव्हरेंड मे तिला मदत करण्यासाठी आले. ते म्हणाले, " कैंटरबरी, कनेक्टिकट, व आपला देश यांच्यासाठी ही अत्यंत लाजिरवाणी गोष्ट आहे."





प्रूडेंसला पण खूप वाईट वाटले. पण तिने केलेल्या संघर्षाबद्दल तिला अभिमान वाटत होता. ती आपल्या विद्यर्थिनीचे चेहरे विसरू शकत नव्हती. तिची खात्री होती की शाळा सुरू करून तिने एका चांगल्या कामाची सुरवात केली होती.



# अंत के शब्द

प्रूडेंसने शाळा विकून टाकली व ती आपल्या पतिकडे न्यूयार्कला निघून गेली. १९३८ मधे कनेक्टिकटमधे "ब्लॅक कानून" रद्द करण्यात आला. ज्या लोकांनी सुरवातीला हा कायदा पारित केला होता त्यांच्यापैकिच काही लोकांनी कबूल केले की कायदा अन्यायपूर्ण होता. काही दिवसासाठी प्रूडेंस कनेक्टिकटला आली पण नंतर कैंसासमधे तिने वास्तव्य केले.

समान शिक्षणासाठी लढा देणारी प्रूडेंसपहिली शिक्षिका होती. तिच्या अथक प्रयत्नामुळे नंतरच्या लोकांना खूप काही साध्य करता आले. १८६७ मधे वाशिंगटन डी. सी. मधे हावार्ड विद्यापिठ स्थापन झाले ते फक्त कृष्णवर्णिय विद्यार्थ्यासाठी  होते. १८८१ मधे कृष्णवर्णिय विद्यार्थ्यासाठी बुकर टी वाशिगटने टस्कजी इंस्टिट्यूटची स्थापना केली ही बातमी ऐकून प्रूडेंसला खरोखरीच खूप आनंद झाला.

१८९० मधे प्रूडेंस मरण पावली. प्रूडेंसच्या पुष्कळ जुन्या विद्यार्थ्यांनी तिचे काम पुढे चालू ठेवले. प्रगतीपथावर नेले. साराह हैरिस पुढे जाऊन स्वत: शिक्षिका बनली व तिने अनेक कृष्णवर्णिय मुलांना शिकविले. बरीच प्रगती झाली होती. तरीहि तुलना केली तर कृषणवर्णिय मुलांकडे गोर्या मुलापेक्षा कमी आणि तीसुध्दा जुनी पुस्तके असत. त्यांच्याशाळेतील शिक्षकांनासुध्दा खूप अडचणींना तोंड द्यावे लागत होते. मग १९५४ मधे अमेरिकेच्या उच्च न्यायालयाने कृष्णवर्णिय व गोरी मुल यांच्यासाठी वेगवेगळ्या शाळा बेकायदेशिर ठरविल्या.

आपल्या शाळेत साराह हैरिसला प्रवेश देऊन प्रूडेंसने समान शिक्षणासाठी पहिले महत्वपूर्ण पाऊल टाकले होते.

**समाप्त**